राज्यात लघु-वस्त्रोद्योग संकुल (Mini Textile Park) स्थापन करण्याकरीता अनुदान देण्याबाबतची योजना सुरु करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. योजना २०२४/प्र.क्र. ३/टेक्स-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- ०६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

वस्त्रोद्योग विभागाचे एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ दि.०२.०६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे. राज्यात नवीन वस्त्रोद्योग आकर्षित करुन खाजगी गुंतवणूक वाढविणे व नवीन वस्त्रोद्योगांना प्रोत्साहन मिळण्याच्या उद्देशाने राज्यातील औद्योगिक क्षेत्रात लघु-वस्त्रोद्योग संकुले स्थापन करण्यास भांडवली अनुदान देण्याची योजना सुरु करण्याचे प्रस्तावित आहे. वस्त्रोद्योगाच्या शाश्वत विकासाला चालना देणे हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. सदर लघु-वस्त्रोद्योग संकुले स्थापन करताना वस्त्रोद्योगाच्या संपूर्ण क्षेत्रासाठी अनुकूल वातावरण निर्मिती व वस्त्रोद्योग व्यवसायातील मूल्य साखळीचा विकास होणार आहे. सदर योजनेंतर्गत नवीन लघु- वस्त्रोद्योग संकुल तयार करण्यासोबत वस्त्रोद्योगांची कार्यक्षमता वाढवणे, सातत्यपूर्ण नवकल्पना आणि जागतिक व्यासपीठावर स्पर्धात्मकतेद्वारे वस्त्रोद्योग व्यवसायाचे भविष्य उज्वल करणे हा मुख्य उद्देश आहे. या संकुलांमुळे राज्यात मोठ्या प्रमाणात रोजगाराच्या संधी उपलब्ध होणार आहेत. वस्त्रोद्योग व्यवसायाशी निगडीत सर्व घटकांचा यामुळे फायदा होणार आहे. त्यामुळे लघु-वस्त्रोद्योग संकुले, स्थानिक वस्त्रोद्योग क्षेत्र व त्याच्या निगडीत क्षेत्राला बळकट करणार आहेत तसेच जागतिक स्तरावर एक महत्त्वाचे औद्योगिक क्षेत्र म्हणून वस्त्रोद्योगाचे स्थान निर्माण करणार आहेत. या सर्व बाबी विचारात घेता, राज्यात लघु-वस्त्रोद्योग संकुल (Mini Textile Park) स्थापन करण्यास अनुदान देण्याबाबतची नवीन योजना सुरु करण्याचा प्रस्ताव दिनांक २५ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये सदर विषयाबाबत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यात लघु-वस्त्रोद्योग संकुल (Mini Textile Park) स्थापन करण्यास अनुदान देण्याबाबतची नवीन योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावनेमध्ये नमूद केल्यानुसार राज्यात नवीन वस्त्रोद्योगांना प्रोत्साहन मिळण्याच्या उद्देशाने राज्यातील औद्योगिक क्षेत्रात लघु-वस्त्रोद्योग संकुले स्थापन करण्यास भांडवली अनुदान देण्याची योजना सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यात नवीन खाजगी वस्त्रोद्योग व्यवसाय उभारण्यास प्रोत्साहन देऊन महाराष्ट्र राज्य तसेच इतर राज्यातील खाजगी संस्थांकडून रु.१८०० कोटी पर्यतची गुंतवणूक आकर्षित करणे. या योजनेतर्गत राज्यात अंदाजित ३६,००० प्रत्यक्ष /अप्रत्यक्ष रोजगार निर्मिती करणे, वस्त्रोद्योग क्षेत्रातील संबंधित सर्व घटकांचा विकास करणे, वस्त्रोद्योग व्यवसायाची कार्यक्षमता वाढवून वस्त्रोद्योग घटकांचे उत्पादन व दर्जा वाढवणे व राज्याला वस्त्रोद्योग क्षेत्राचे प्रमुख निर्यात केंद्र बनवणे व समुह पद्धतीने विकास करुन सामाईक सुविधा पुरवणे ही या योजनेची प्रमुख उद्दिष्टे आहेत.

३. सदर योजनेचे स्वरुप व कार्यपद्धती खालीलप्रमाणे असेल:-

१. सदर योजना ही राज्यातील औद्योगिक क्षेत्रात ( MIDC) लघु-वस्त्रोद्योग संकुल (Mini Textile Park) उभारणी करणाऱ्या खाजगी संस्थांना भांडवली अनुदान देण्याची असेल. खाजगी गुंतवणूकदारांकडून राज्यातील सर्व महसूली विभागातील औद्योगिक क्षेत्रात लघु-वस्त्रोद्योग संकुल उभारली जातील. सदर योजनेचा कालावधी दि.३१ मार्च, २०२८ पर्यत राहील. या कालावधीमध्ये लघु-वस्त्रोद्योग संकुल(Mini-Textile Park) ची उभारणी करुन उत्पादन सुरु होणे गरजेचे आहे.

२. राज्याच्या प्रत्येक महसूल विभागात प्रत्येकी ३ अशा ६ महसूल विभागात एकुण १८ लघु वस्त्रोद्योग संकुले उभारण्यात येतील. या १८ संकुलांपैकी प्रत्येक महसूल विभागात १ याप्रमाणे एकुण ६ संकुले निर्यातभिमुख असतील. संकुलासाठी कमाल क्षेत्र १० एकर इतके असेल. या मर्यादीत क्षेत्राच्या पलीकडे संकुल विस्तारास परवानगी दिली जाणार नाही. सर्व नवीन संकुले महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या (MIDC) अखत्यरित जागेवर असणे बंधनकारक आहे. MIDC क्षेत्रात जागेची निवड संबंधीत संस्था करेल.

३. टेक्सटाईल पार्कमध्ये किमान चार घटक अंतर्भूत असतील ज्यामध्ये संपूर्ण वस्त्रोद्योग मुल्य साखळीचा समावेश असेल उदा. सूतगिरणी, यंत्रमाग, प्रक्रिया आणि गारमेंटिंग यासारख्या प्रक्रियांचा समावेश असेल. जिनिंगची प्रक्रिया करणे ऐच्छिक असेल.

४. वीजदर अनुदान व सौर उर्जा अनुदानाच्या तरतूदी एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ नुसार लागू होतील.

५. संकुलामध्ये एफ्लुएंट ट्रीटमेंट प्लांट/ झिरो लिक्विड डिस्चार्ज सिस्टीम, सोलर प्लांट, आरोग्य केंद्र आणि पाळणाघर यासारख्या आवश्यक सुविधांसह सामायिक सुविधा असणे आवश्यक आहे.

६. महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक तत्वांचे पालन संस्थेने करण्यात यावे. पाणी/जमीन/वातवरण प्रदुषण होणार नाही यासंदर्भात संबंधीत कार्यालयांचे प्रमाणपत्र तसेच महाराष्ट्र औद्योगिक क्षेत्रात प्रकल्प उभारण्यास आवश्यक अशी सर्व प्रमाणपत्र उपलब्ध करुन घेण्याची जबाबदारी संस्थेच्या प्रवर्तकाची राहील.

७. प्रत्येक महसूल विभागात १ याप्रमाणे एकुण ६ संकुले निर्यातभिमुख असतील. त्यामुळे केवळ निर्यातीवर लक्ष केंद्रित करणाऱ्या घटकांना उद्योग विभागाच्या निर्यात धोरणानुसार सर्व लाभ मिळतील.

८. लघु-वस्त्रोद्योग संकुल स्थापन करताना रु.१०० -१२५ कोटी रुपयांपर्यंत गुंतवणूक करता येणार आहे. सदर योजनेतर्गत एकूण प्रकल्प किंमतीवर (जमीन, बांधकाम, यंत्रसामग्री, सौरऊर्जेच्या खर्चासह) होणाऱ्या ४०% खर्चाची रक्कम किंवा रु. ३० कोटी यापैकी जे कमी असेल तेवढे भांडवली अनुदान मिळेल.

९. संकुलामध्ये ५०% पेक्षा जास्त महिला कामगार असल्यास एकूण प्रकल्प खर्चावर अतिरिक्त ५% भांडवली अनुदान मिळण्यास सदर प्रकल्प पात्र ठरतील. परंतू असे अनुदान रु. ३५ कोटी पर्यत मर्यादीत असेल.

१०. एफ्लुएंट ट्रीटमेंट प्लांट (ETP)/ झिरो लिक्विड डिस्चार्ज (ZLD) व स्टीम जनरेशन प्लांट स्थापन करणेकरीता एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मधील तरतूदीनुसार अनुज्ञेय अनुदान देय असेल.

४. लघु-वस्त्रोद्योग संकुल स्थापन करण्यासाठी संस्था निवडीचे निकष खालीलप्रमाणे असतील:-

१. लघु-वस्त्रोद्योग संकुल स्थापन करण्यासाठी असलेल्या इच्छुक गुंतवणूक संस्था या एकल नोंदणीकृत असाव्यात.
२. वस्त्रोद्योग क्षेत्रातील संस्थेच्या अनुभवाचा दाखला सादर करणे अनिवार्य राहील.
३. वस्त्रोद्योग क्षेत्रात संस्थेने यशस्वीरित्या काम पार पाडल्याचा दाखला सादर करणे अनिवार्य राहील.
४. सदर संस्थेचे तत्सम प्रकल्प व्यवस्थापित करण्यातील कौशल्यबाबतचा तपशील प्रस्तावात सादर करावा.
५. खाजगी गुंतवणूकदार संस्थेची गुंतवणूकीची क्षमता प्रस्तावात नमूद करावी.
६. स्थापित आणि कार्यक्षम पुरवठा साखळी असलेल्या संस्था ज्या उत्पादन सामग्री आणि तयार वस्तुंचा अखंड पुरवठा करण्यास सक्षम असतील जेणेकरुन त्यामधून संस्था व संकुल या दोघांनाही फायदा होऊ शकतो अशा संस्थांना प्राधान्याने निवडण्यात येईल.
७. आकांक्षित जिल्ह्यांमध्ये वस्त्रोद्योग व्यवसायाचा विकास करण्याच्या उद्देशाने सदर जिल्ह्यांमधील MIDC क्षेत्रामध्ये असलेल्या प्रकल्पांना प्राधान्य दिले जाईल.

५. लघु-वस्त्रोद्योग संकुलाचे प्रस्ताव मंजूरीची कार्यपद्धती खालीलप्रमाणे असेल:-

लघु-वस्त्रोद्योग संकुल उभारण्यास इच्छुक असलेल्या उद्योगांनी गुंतवणुकीचे तपशील, एकुण रोजगार निर्मिती, पर्यावरणावर होणारा परिणाम, संकुलातील पायाभूत सुविधा आणि प्रकल्प उभारणीची प्रस्तावित कालमर्यादा या बाबी समाविष्ट करुन सर्वसमावेशक आणि तपशीलवार प्रकल्प अहवाल तयार करणे आवश्यक आहे. सदर प्रकल्प अहवाल तयार करताना या योजनेच्या पात्रता निकषांचे पालन करणे आवश्यक आहे.

उद्योगांनी तयार केलेले तपशीलवार सविस्तर प्रकल्प अहवाल वस्त्रोद्योग विभागाकडे सादर करावेत. सदर प्रकल्प अहवालांची वस्त्रोद्योग विभागाद्वारे मान्यता दिलेल्या संस्थेकडून तपासणी करण्यात येईल. सदर संस्था प्रकल्प अहवालांची वर्धनक्षमता व व्यवहार्यता तपासेल तसेच योजनेच्या निकषानुसार तपासणी करेल.

तद्नंतर सचिव (वस्त्रोद्योग) यांचे अध्यक्षतेखाली असलेली समिती प्रकल्प अहवालांचे प्रकल्प उभारणीसाठी विहीत निकषांच्या आधारे तपासणी/छाननी करेल. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:-

| अ.क्र | समिती सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४ | आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर | सदस्य |
| ५ | सहाय्यक आयुक्त (तांत्रिक), नागपूर | सदस्य |
| ६ | उपसचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीने प्रकल्प अहवालांचे पूर्ण मूल्यमापन केल्यानंतर ज्या उद्योगांचे प्रस्ताव विहीत निकष पूर्ण करतील अशा उद्योगांना प्रकल्प उभारणी करण्यास मान्यता देण्यात येईल.

६.  सदर योजनेतील प्रकल्पांना भांडवली अनुदान वितरण करावयाचे निकष खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे:-

भांडवली अनुदानाचा पहिला हप्ता हा लघु-वस्त्रोद्योग संकुल उद्योजगांमार्फत कार्यान्वित केल्यावर, विनिर्दिष्ट निकषांनुसार निर्धारित केलेल्या पात्र रकमेच्या ६०% रक्कम वितरीत केली जाईल व भांडवली अनुदानाचा दुसरा हप्ता हा १२ महिन्यांच्या कालावधीसाठी लघु-वस्त्रोद्योग संकुलामध्ये सर्व घटकांचे व्यवसाय यशस्वीरित्या पार पाडल्यानंतर, पात्र रकमेपैकी उर्वरित ४०% अनुदानाचा दुसरा हप्ता म्हणून वितरित केला जाईल.

७.  सदर शासन निर्णय दि. २५ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं १८७/२०२४/व्यय-२ दि.२८.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१२१३४४२९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2024.03.06 12:22:47 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा .उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय) महाराष्ट्र राज्य याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सर्व मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
८. मा. खासदार (सर्व), महाराष्ट्र राज्य.
९. मा. आमदार (सर्व), महाराष्ट्र राज्य.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
१३. संचालक ,(रेशीम)रेशीम संचालनालय.नागपूर ,
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, नवी मुंबई
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२,मुंबई,नागपूर.
१७. प्रादेशिक उपायुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर/औरंगाबाद/नागपूर/मुंबई.
१८. निवडनस्ती (टेक्स २).